


किंमत १२ रुपये

धार्मिक प्रकाशन संस्था

१७२ एफ, गिरगाव रोड, मुंबई ४०० ००४.

दूरध्वनी : (०२२) २३८६ ६१५१

For Details log onto : www.samratprakashan.com

For any suggestions email : contact@samratprakashan.com

# मंगलाष्टके

For Details log onto :
www.samratprakashan.com
For any suggestions email :
contact@samratprakashan.com

*

*



*

प्रकाशक :
धार्मिक प्रकाशन संस्था
१७३ एफ्, जगन्नाथ शंकरशेठ मार्ग,
गायवाडी समोर, गिरगाव, मुंबई-४०० ००४.
दूरध्वनी : २३८६ ६१ ५१

*

मुद्रक :
रा. शं. जोरी
इंदिरा प्रिंटिंग प्रेस
१००५ सदाशिव पेठ,
पुणे ४११ ०३०.
फोन : ०२०-२४४७७३२९





# मंगलाष्टके

स्वस्ति श्री गणनायकं गजमुखं मोरेश्वरं सिद्धितं ।
बल्लाळो मुरुडं विनायकमहं चिंतामणिं थेऊरं ।
लेण्याद्रिं गिरिजात्मकं सुरवरं विघ्नेहरं ओझरं ।
ग्रामो रांजणसंस्थितं गणपतिंकुर्यात् सदा मंगलम् ।।

卐

प्रारंभी गणनायकासि नमन साष्टांग भावे किजे ।
शेंदूरे डवरोनि सोंड वरवी दूर्वांकुराचे तुरे ।
माझे चित्त विरे मनोरथ पुरे देखोनि चिंता हरे ।
गोसावीसुत वासुदेव कवि रे त्या मोरयाला स्मरे ।।

卐

मोठे दोंद कटी फणींद्र बरवा भाळी शशी शोभतो ।
हस्ती अंकुश लाडू पद्म परशू दंती हिरा झळकतो ।
पायी पैंजण घागरी रुणझुणी प्रेमे बरा नाचतो ।
ऐसा देव गणेश तो वधुवरां कुर्यात् सदा मंगलम् ।।

हेरंबा गणनायका गजमुखा, विघ्नेश्वरा मोरया।
संगे घेऊनी शारदेस अजि या कार्यास धावून या।
येऊ दे कुलस्वामी आणि अमुची माता कुलस्वामिनी।
देण्या आशिष मंडपी वधुवरा कुर्यात सदा मंगलम्।।

卐

ॐकारातून जाहली प्रगट जी मूर्ती गणेशा तुझी।
देवी मंगळ शारदे सहित मी ध्यातो तुम्हासी अजि।
येऊनी शुभ मंडपी वधुवरा, देऊन जा आशिष।
हेची नम्र पदी तुझ्या विनवणी कुर्यात सदा मंगलम्।।

卐

एताः श्रीकुलदेवता मुनिवरा एते वसिष्ठादयो।
नेतारः खलु राष्ट्रकार्यकुशल एते स्वधर्मोत्सुकाः।
एषा धन्यतमा सुपुत्रजननी वन्द्यार्यभूःपावनीम्।
काली श्रीश्च सरस्वती च सततं कुर्वन्तु वाम् मंगलम्।।

卐

लक्ष्मी कौस्तुभ पारिजातक सुरा धन्वंतरिश्चंद्रमः।
गावः कामदुधा सुरेश्वर गजो रंभादिदेवांगनाः।
अश्वः सप्त मुखोद्विषं हरिधनुं शंखोऽमृतं चांबुधे।
रत्नानीह चतुर्दश प्रतिदिने कुर्वंतुवोर्मंगलम्।।

गंगा सिंधु सरस्वतीच यमुना गोदावरी नर्मदा ।
कावेरी शरयू महेंद्रतनया चर्मन्वती वेदिका ।
क्षिप्रा वेतवती महासुरनदी ख्यातातया गंडकी ।
पूर्णा पूर्ण जले समुद्र सरिता कुर्यात् सदा मंगलम् ।।

卐

कस्तूरी तिलकं ललाटपटले वक्षः स्थळे कौस्तुभं ।
नासाग्रे नव मौक्तिकं करतले वेणुः करे कंकणं ।
सर्वांगे हरि चंदनं सुललितं कंठेच मुक्तावली ।
गोपस्त्री परिवेष्टिती विजयते कुर्यात् सदा मंगलम् ।।

卐

नत्वा त्वां कुलदेवतां च कमलां विघ्नेश्वरं शारदाम् ।
वक्ष्ये कृष्णविवाहकौतुकमिंद चेतोहरं शृण्वताम् ।
स्वस्यैवान्वगुणानुवर्णनपरिश्रान्तस्य विश्रांतये ।
नित्यं स्वोदरपूर्तये कुहकवत् कुर्यात सदा मंगलम् ।।

卐

शास्त्री आश्रम चार जे कथियले त्यामाजि जो उत्तम ।
देतो स्वार्थ परार्थ जोडुनि नरा ऐसा गृहस्थाश्रम ।
झाली बद्ध तया विवाहविधिने स्वीकारुनी सौख्यदा ।
मांगल्यप्रद 'सावधान' रव त्या कुर्यात् सदा मंगलम् ।।

माथा राखडि मूद फूल कुपरी मासे जळे आवळे।
ताईता वरि मोर बोर जडिले गंगाजळी गुंफिले।
भांगीं लाल गुलाल कुंकुमचिरी लेऊनि आल्या पहा।
येवोनि वधुमंडपी वधूवरां कुर्यात् सदा मंगलम् ।।

卐

राजा भीष्मक रूक्मिणीस नयनीं देखोनि चिंता करी।
ही कन्या सगुणा वरा नृपवरा कवणासि म्यां देईजे।
आतां एक विचार कृष्ण नवरा त्यासी समर्पू म्हणे।
रुक्मा पुत्र वडील त्यासि पुसणे कुर्यात् सदा मंगलम् ।।

卐

काशी कांचि अवंतिका मधुपुरी माया अयोध्यापुरी।
श्रीमद्वारावती सुपुण्य जनका विख्यात पृथ्वीवरी।
क्षेत्री धर्मपरायण अनुपमें जे वर्णिले कौतुके।
ते कल्याण वधुवरासी सुमती कुर्यात सदा मंगलम् ।।

卐

लाभो संतती संपदा बहु तुम्हा लाभोतही सद्गुण।
साधोनि स्थिर कर्मयोग अपुल्या व्हा बांधवां भूषण।
सारे राष्ट्र धुरीण हेचि कथिति कीर्ती करा उज्ज्वल।
गार्हस्थ्याश्रम हा तुम्हां वधुवरां देवो सदा मंगलम् ।।

औदार्ये इतरां तिघांस जगती जो जाहला आश्रम ।
दावी देउनि धैर्य अज्ञ मनुजा सन्मार्ग तो अक्षय ।
जो राजा जनकादिकां जनहिती सद्‌बुद्धि दे निश्चल ।
गार्हस्थाश्रम तो तुम्हा वधुवरा देवो सदा मंगलम् ।।

卐

पातिव्रत्य धरून थोर मिळवी कीर्तीस तूं भवरी ।
सच्छीले कृतिनेही भूषित सदा दोहींकुलात करी ।
धर्मन्यायपथा धरूनि जगती पावा पहा गौरव ।
लाभोनि पतिचे सुख हरि कृपे तूं अष्टपुत्रा भव ।।

卐

गोत्रे भिन्न परस्पराहूनि तशी की भिन्न ज्यांची कुळे ।
जीवे एकचि होती ती वरवधू आजन्म ज्याच्यामुळे ।
तो ये ईशकृपे घडून सदनी मांगल्या वैवाहिक ।
दांपत्या चिरनित्य शंकरकृपे कुर्यात् सदा मंगलम् ।।

卐

या कुंदेन्दु तुषारहारधवला या शुभ्र वस्त्रावृता ।
या वीणावर दंडमंडित करा या श्वेत पद्मासना ।
या ब्रह्माच्युत शंकर प्रभृतिभिर्देवैः सदा वंदिता ।
सामांपातु सरस्वती भगवती कुर्यात् सदा मंगलम् ।।

चिंता फार करी म्हणे जनक तो हे जानकी नोवरी।
द्यावी या रघुनायका विधिकरें वाटे तसे अंतरी।
केला म्यां पण हा परंतु धनु हे वोढील कोणे परी।
जावाई रघुनाथ या वधुवरां कुर्यात् सदा मंगलम्।।

卐

विश्वमित्र वसिष्ट सर्वहि ऋषि आले सितासैंवरा।
सांगातें रघुराज पूर्ण विजयी लावण्यतेजोहिरा।
हाती बाण-धनुष्य घेऊनि पुढे शोभे बरा नोवरा।
गोसावीसुत स्वामिराज नृप तो कुर्यात् सदा मंगलम्।।

卐

विष्णूला कमला शिवावि गिरिजा कृष्णा जशी रुक्मिणी।
सिंधूला सरिता तरुसि लतिका चंद्रा जशी रोहिणी।
रामासी जनकात्मजा प्रिय जशी सावित्री सत्यव्रता।
तैशी ही वधू साजिरी वरितसे हर्षे वरासी आता।।

卐

लक्ष्मी कौस्तुभ पांचजन्य धनु हे अंगीकरी श्रीहरी।
रंभा कुंजर पारिजातक सुधा देवेंद्र हे आवरी।
दैत्यांप्रति सुरा विधू विष हरा उच्चैःश्रवा भास्करा।
धैवेद्य वधू वरासि चवदा कुर्यात् सदा मंगलम्।।

केली चित्रविचित्र सुंदर सभा शृंगारिली मंदिरे ।
राजे सर्वहि रावणादिक बरे पाचारिले आदरे ।
त्यामध्ये रघुनाथरूप जनके ते देखिले साजिरे ।
जावाई रघुनाथ या वधुवरा कुर्यात सदा मंगलम् ।।

卐

वैदेही नवमंदिरावरी उभी वक्त्रे सखीला पुसे ।
पृथ्वीचे बहुसाल राय मिनले श्रीराम कोठे असे ।
लक्षी का घननीळ श्याम बरवा नेत्रोत्पळे राजसे ।
विश्वमित्र ऋषि समागमि असे कुर्यात सदा मंगलम् ।।

卐

मत्स्यः कूर्म वराहकादि नृहरी चौथा बटु पंचमा ।
श्रीमदभार्गव राम राघव हरी बौद्ध कलंकी नमा ।
हे दहा अवतार भूर्भूवधरा पाताळिचे भूपती ।
संरक्षन्तु वधूवरांवि सुमती कुर्यात सदा मंगलम् ।।

卐

गंगा भीमरथी कलिंदतनया मंदाकिनी संगमी ।
कावेरी शरयू सरस्वति शिवा कृष्णा पयोष्णी नमी ।
रेवा गंडकी कौशिका प्रवरदा भोगावती गोमती ।
सिंधु धर्मक शोणभद्र शिव कुर्यात सदा मंगलम् ।।

कंठे यस्य विराजते हि गरलं शीर्षे च मंदाकिनी।
वामांके गिरिजाननं कटितटे शार्दूलचर्मांबरम्।
माया यस्य रुणद्धि विश्वमखिलं तस्मै नमः शंभवे।
सस्थाणुः स्थिर भक्तियोग सुलभः कुर्यात सदा मंगलम्।।

卐

यं ब्रह्मा वरुणेंद्ररुद्रमरुतः स्तुन्वति दिव्यै स्तवैः।
वैदैः सांगपदक्रमोपनिषदैर्गायंति यं सामगाः।
ध्यानावस्थिततद्गतेन मनसा पश्यंति यं योगिनो।
यस्यांतं न विदुः सुरासुरगणा कुर्यात सदा मंगलम्।।

卐

योग्यामाजि शिरोमणीच अथवा जो पार्वतीचा पति।
जो कैलासि करीत वास अथवा गंगा जयाची सती।
भाळी चंद्र तसेच नाग शरिरी ज्याच्या रहाती सदा।
तो शंभू त्रिपुरारि या वधूवरां रक्षो सदा सर्वदा।।

卐

आता सावध सावधान समयी साधा समीपे वसे।
वाग्वादान करा पळार्धघटिका संपूर्ण आली असे।
भावे सद्गुरुचे पदांबुज धरा चित्ती स्मरा सादरे।
दो पक्षी कुळदैवते वधुवरां कुर्यात सदा मंगलम्।।

लक्ष्मीकांतपदारविंद हृदयीं भावे स्मरा यापरी।
बोले सद्गुरु सावधान समयी राहोतु वाजांतरी।
होती मंगल घोष हे द्विजमुखे संपूर्ण आडी घडी।
सोडा अंतरपाट हा वधुवरां कुर्यात सदा मंगलम्।।

卐

तेज:पुंज दिसे प्रवालगिरिसा, रक्तांबरा नेसला।
देवांचा अधिदेव तो गणपती या मंडपी बैसला।
पूजा मान्य करा, प्रसन्न वदने स्वीकारिली वंदना।
आता एकच मागणे गजमुखा कुर्यात सदा मंगलम्।।

卐

अंबा अष्टभुजा त्रिलोकजननी देवी कुलस्वामिनी।
आली लग्नघरा निवास करण्या आवाहना ऐकुनी।
आता तीच उभी मुठीत मिटल्या घेऊनिया अक्षता।
माते, हो वरदायिनी वधुवरां, कुर्यात सदा मंगलम्।।

卐

घेई जन्म नवा शिवास वरण्या दाक्षायणी ना वृथा।
तर्कातीत तरीहि साथ पहिल्या मातापित्यांची कथा।
प्रीतीभाव असा चिरंजिवपणे जन्मांतरी नांदतो।
श्रद्धा हीच तुम्हास सौख्यद ठरो, कुर्यात सदा मंगलम्।।

प्रीतीवाचुन ना प्रपंच फुलतो हे सत्य ध्यानी धरा।
आदर्शप्रत पोचवा घरकुला, नीति सदा आदरा।
सांभाळा कुलकिर्ती, धन जे मातापित्यांनी दिले।
त्यांचे श्रेय सुखप्रद तुम्हां, कुर्यात सदा मंगलम्।।

卐

अग्नी, ब्राह्मण, आप्त, मित्र अवघ्या आवाहिता देवता।
आनंदे नवदंपतीस बघती, अन् वर्षती अक्षता।
आशीर्वाद म्हणून तांदुळ धरा हे आपुल्या मस्तकी।
मागा हेच पुनः पुनः वरवधु, कुर्यात सदा मंगलम्।।

卐

जेतुं यस्त्रिपुरं हरेण हरिणा व्याजाद्बलिं बघ्नता।
स्रष्टुं वारिणवोद्भवेद भवुनं शेषेण धर्तुं धराम्।
पार्वत्या महिषासुरमथने सिद्धादिभिर्मुक्तये।
व्यातः श्रीगिरिजासुतो गणपतिः कुर्यात सदा मंगलम्।।

卐

वाजे ती सनई वसा चौघडा दारांत तो मंजुळ।
आले आप्त सखे विवाहसमयी चिंतावया मंगल।
पाहोनी उभया इथे वधुवरा, सानंदती मानसी।
देती आशिष लाडक्या वधुवरा कुर्यात सदा मंगलम्।।

सीता राम रमेस माधव तसा की पार्वती शंकरा।
तैसी ही नवरी सुयोग्य बनूनी लक्ष्मीच येते घरा।
प्रीतीची वरमाळ घालूनी गळा, चाला सुखे संगती।
संसारी सुखरूप होऊनी रहा कुर्यात सदा मंगलम् ।।

卐

सनईच्या सुरात सूर मिसळे तो दारिचा चौघडा।
नारीकेल फलास घेऊनी करी, आहे पती गे खडा।
घालोनी वरमाळ घे वरुनी तू बाळे तुझा श्रीपती।
राणी होऊनी राज्य त्या गृही करी कुर्यात सदा मंगलम् ।।

卐

प्रीतीचा भरू दे तडाग खुलु दे तो पद्मवृंदामुळे।
शोभा ती खुलु दे सुरम्य दिसु त्या चित्र ऐक्यामुळे।
जिंकोनी घर प्रीतीने सहज घे बाळे नवे चांगले।
स्नुषा होऊन लाडके सुखी रहा कुर्यात सदा मंगलम् ।।

卐

जाणा श्रेष्ठ असे विवाह म्हणजे आहे मधुमीलन।
दोघांच्या मधुजीवनी मधुरता घेऊन येतो क्षण।
भाग्याचा दिन आज हा उगवला, ही तो हरीची कृपा।
आता लीन प्रभु पदी रहा कुर्यात सदा मंगलम् ।।

शोभे तो शुभ ---- वार तिथी ती ---- मासातली।
लाभे आज मुहूर्त गोड बरवा कार्या तिथी चांगली।
पाहोनी अजि मंडपी वधुवरा जो हर्ष झाला मनी।
केला व्यक्त करून काव्य इवले कुर्यात सदा मंगलम् ।।

卐

मालाकार परस्परे कर गळा घालोनि गोपांगना।
गाती नाचति पाहती अवघिया एका जगज्जीवना।
सोन्याचे मणि ओविले भुजगणी गोऱ्या शशांकानना।
त्यांशी क्रीडत कृष्णजी मधुवनीं कुर्यात सदा मंगलम् ।।

卐

आता सावध सावधान घटिका संपूर्ण आली भरू।
भावे सद्गुरुते स्मरा गलबला कोण्ही नका हो करू।
चिंतावे कुलदेवतेसि हृदयी एकाग्रचित्त बसा।
वेदीच्या कलशावि सादर असा कुर्यात सदा मंगलम् ।।

卐

आली लग्न घटी समीप नवरा घेऊनी यावा घरा।
गृह्योक्ते मधुपर्क पूजन करा अंतःपटाते धरा।
दृष्टादृष्ट वधु-वरा न करतां दोघे करावी उभी।
वाजंत्रे बहु गलबला न करणे कुर्यात सदा मंगलम् ।।

सोन्याच्या रथी बैसुनी वरीवरी येतो रवि अंगणी।
येवो भाग्यरवि तसाच उद्या बाळे तुझ्या जीवनी।
गुंफुनी कर ते करात उभया, नांदा सुखे सर्वदा।
हाची आशिष लाडके मुली तुला कुर्यात सदा मंगलम् ।।

卐

सीता सुंदरी लग्नमंडपि उभी शृंगारलेल्या महा।
लक्ष्मी कोण उभा सलज्ज नयनी तो राम राजा अहा।
ज्याचा हस्त न लागता शिवधनु ते भंग आले झणी।
द्या सीता प्रति रामचंद्र प्रभु हो कुर्यात सदा मंगलम् ।।

卐

होती आजवरी पराश्रित परी आता परा आश्रया।
होवो ही सुवधु करो पतिगृही सर्वांवरी प्रेमया।
प्रेमाने पतीशी सुवर्तन करो सद्भाव जोडी भला।
श्रद्धेने तुझिया घडो प्रभु असे सर्वेश्वरा मंगला ।।

卐

केले पालन आजवरी जपुनिया जो ब्रह्मचर्याश्रम।
त्याते संपवुनि तुम्ही वरितसा आता गृहस्थाश्रम।
नांदा सौख्यभरे शतायु बनुनी व्हा आणि वीर प्रसू।
कीर्तिने मिळवा अखंड भरुनि नि उद्धरा जन्मभू ।।

ॐ तस्तत् श्री सावधान घटिका सुलग्न संधी असे।
दोघेही परिसा सलक्ष वचने ब्रह्माक्षरांचे ठसे।
पत्नी एक वरा समोर वधुही भोगांगना की स्वये।
पातिव्रत्यपणा धरोनि वधु तू, भोगी सुखा निश्चये।।

卐

आली ही शुभकारिणी मधुवटी आनंद चोहींकडे।
वाद्ये मंगल वाजती बरसती स्नेहामृताचे सडे।
हे येथे गणगोत सर्व जमले द्याया शुभांशीर्वचा।
नांदा सौख्यभरे कृतार्थ बनवा संबंध हा प्रीतिचा।।

卐

मधुर मधुर वाद्ये वाजती मोददाची।
वधुवर करि माला घेऊनी सज्ज होई।
जवळ जवळ आली ही घडी मिलनाची।
मुदित उदित प्रेमे भेट दोन्ही जिवांची।

卐

इंद्रश्चंद्र कुबेर वायु निऋति ब्रह्मा कवी दिक्पती।
सिद्धश्चारणयक्षगुह्यक रवी हाहाहुहु वाक्पती।
गंधर्वादि मरुद्गणा सुरमुनीकुभांश शेवागिरा।
ईशनाग्नि जलेंद्र हे वधुवरा कुर्यात सदा मंगलम्।।

लक्ष्मीशो भुवनत्रयो नियदितो देवान्मशुष्योरगान्।
संस्थातु करुणानिधी करुणया मार्तंडवशे ययौ।
संकल्पो निजगर्भसंभवकृते जन्मन्यसा धारणे।
जातः श्रीरघुनायकस्य जननं कुर्यात सदा मंगलम्।।

卐

नागो भाति मदेन कंजलरूहः पूर्णेंदुना शर्वरी।
शीलेन प्रमदा जवैन तुरगो नित्योत्सवमादम्।
वाणी व्याकरणेन हंसमिथुनैर्नद्य सभापंडितैः।
सत्पुत्रेण कुलं नृपेण वसुधाकुर्वन्तु वो मंगलम्।।

卐

श्रीवस्तांकित भूषणे तुळशिची आपाद माळा रुळे।
माथा रत्नकिरीट कौस्तुभ गळा सूर्यप्रभे ना तुळे।
केयूरांगद कुंडले-सुरचना चौहस्तकी आयुधे।
लक्ष्मीयुक्त मुरारि तो वधुवरां कुर्वन्तु वो मंगलम्।।

卐

यो देवस्य शिवस्य ताण्डवविधौ हर्षान्मदायाऽऽगतैः।
कूजद्भिर्भ्रमरैर्युतं कमलं स्वीयं धनान्ते विभुः।
कुर्वन्वल्गु सुभाषणं स्खलदथो हास्यं तनोतीश्वरी।
नाट्यं चैव मदावहं स भगवान् कुर्यात सदा मंगलम्।।

卐





# अथ विवाहललित

अविरलमदधाराधौतकुंभ शरण्यः ।
फणिवर युत गात्रः सिद्धसाध्यादिवंद्यः ।
त्रिभुवन जन विघ्नध्वांत विध्वंसदक्षो ।
वितरतुगजवक्त्रः संततं मंगलं वः ।।१।।

卐

विघ्नेश्वरो विघ्नविदूरकारी ।
निर्विघ्न कार्ये सकलार्थसिद्धिः ।
विघ्नेश्वरो विघ्नहरेश पूज्यो ।
वधूवराभ्यां शुभतांददातु ।।२।।

卐

करतलघृतलड्डु भोजनः सर्वदाय ।
प्रणत जन समूहे सिद्ध दोयस्तु नित्यम् ।
असुरसुरमुनींद्रैपूजितो विघ्नहर्ता ।
सकल भुवननाथो मंगलं वां ददातु ।।३।।

सकलभुवनवृंदानंदसंदोहकंद ।
प्रतिदिनममृतौधैः प्रीणितः स्वर्गवृंदः ।
परमपुरुष चित्तादुद्दतो रोहिणीशः ।
कुमुदकुल विकासी मंगलं वां ददातु ।।४।।

卐

दिनकर शशिभौमाश्चंद्र पुत्रो मरेज्यो सुर ।
कुल गुरुरार्किः सैंहिकेयश्च केतुः ।
ददतु शुभ फलं वामिष्ट लग्ने सुरेशा ।
विधि हरिहर संज्ञा सहस्त्रियोविघ्नराज ।।५।।

卐

दलितदनुजवृंद यस्य मंत्र प्रभावत् ।
सुरपतिरपिभुक्ते निर्भयो नाकराज्यम् ।
शमित सकल दोषं यस्यदृष्ट्या विलग्नं ।
ससुर गुरुरजस्त्रं मंगलं वां ददातु ।।६।।

卐

यन्मंगलं प्रवर शंखगदा धरस्य ।
रामस्य रावण जयाय समृद्यतस्य ।
जित्वानिशाचरपुरीं पुनरागतस्य ।
तत्मंगलं भवतु वो विजयाय नित्यम् ।।७।।

मन्मंगलं त्रिदल मौलिकिरीट रत्न ।
चंद्रप्रभा धौतपदांबुजस्य ।
गौरीविवाह समये शशिशेखरस्य ।
तन्मगलं भवतुवो विजयाय नित्यम् ।।८।।

卐

सकल भवन स्वांत ध्यांत विध्वंसदीप ।
त्रिदशपनिदशोय स्वर्ण ताटंकपत्रम् ।
सकल भुवन लक्ष्मीदायको नामकोऽहां ।
विबुध निखिलमूर्तिमंगलं वो ददातु ।।९।।

卐

यावाद्रीचीस्तरं गान्वहतिसुरनदी जान्हवी पुण्यतोया ।
यावच्चाकाश मार्गेत् पतिहिम्करो भास्करो लोकपालः ।
यावद्वजेंद्रनील स्फटिकमणिशिला वर्तते मेरुशृंगे ।
तावत्त्वं पुत्र पौत्र स्वजन परिवृतो जीव शंभो प्रसादत् ।।१०।।

卐

यन्मंगलं महेंद्रस्य प्राप्तेदेवै समागमे ।
ऋषिभिः स्तूयामानस्य तत्ते भवतु मंगलम् ।।११।।
तदेव लग्नं सुदिनं तदेव । ताराबलं चंद्रबलंतदेव ।
विद्याबलं दैव बलं तदेव । लक्ष्मीपते तेऽघ्रियुगं स्मरामि ।।१२।।

卐





# वधुवरांते चिंतन करविजे

सुलग्न सावधान ।
इष्टदेवता कुलदेवता ग्रामदेवता चिंतन सुमुहूर्त सावधान ।।
लक्ष्मीनारायणचिंतन सावधान ।
ब्रह्मनारायणचिंतन सावधान ।।
उमामहेश्वरचिंतन सुलग्न सावधान ।
जयघंटाशब्दप्रमाणे सुलग्न सावधान ।।
अति समिप सावधान ।। अतिसुलग्न सावधान ।। सावधान ।।

卐





# मुंजीची मंगलाष्टके

श्रीगणेशं वंदे । आधी ध्यावे पार्वती कुमाराला ।
विद्या देतो जो स्मरे त्या नराला ।
देवाचे जो विघ्न तो निवारी ।
पाया देवो वामनो ब्रह्मचारी ।।

卐

वंदू या गणनायकास अजि त्या जो बुद्धिचा अधिपती ।
विद्या लाभ झणी जयास स्मरता, होई असा गणपती ।
येवोनी शुभ मंडपात बटुला, देवोत शुभ आशिष ।
हेची प्रार्थू पदास वंदुनी तया कुर्यात बटो मंगलम् ।।

卐

सत्याने वदने कधी न चुकणे, कर्तव्य सांभाळणे ।
व्यायामा करणे तनु कमविणे, विद्यार्जना जोडणे ।
माता-पितृपदी विनम्र असणे, आज्ञा सदा पाळणे ।
सेवा भाव सदैव ध्यानि धरणे कुर्यात बटो मंगलम् ।।

गेले शैशव बाल्यकालही आता संपून गेला असे।
आता छात्र दशा सुयोग्य वय हे विद्यार्जनाचे असे।
विद्या ज्ञान कला सुखे मिळवून, व्हावे सुखे जीवनी।
बाळा आशिष हा रे तुज दिला कुर्यात बटो मंगलम्।।

卐

आकांक्षा मनी थोर ठेवुनि तुला, बांधोन मुंडावळी।
सौवर्णी तशी मौक्तिके चमकती, तीही पहा आणिली।
मौजीबंधन साज तो चढविला, वैशिष्ट्य हे त्यातले।
आहे ज्ञानही कष्टसाध्य म्हणूनी, हे सर्व तू घातले।।

卐

सन्नारी नटल्या, मुली विनटल्या, होती मने मोदित।
सानापासुनी थोर आप्तजन हे झाले सुसंमीलित।
माला, मंगलतोरणे विलसती आनंद कोंदाटला।
मौजीबंधन साधण्यास बटु तो मार्गही दाटला।।

卐

बाळा शैशव संपले, तव आता विद्यार्जनाची दिशा।
आली, भाग्य तुझे, समीप तुजला आदर्शही थोरसा।
गुर्वाज्ञा शिरसा धरी, तनुमनी राही सदा निर्मल।
वाढो सत्वगुणे, प्रफुल्ल सुमने सद्वर्तनाचे बल।।

वत्सा, बाल्य तुझे अजूनि वदनी रेंगाळते मोहूनी ।
सारी कोमलत्ता मुळी न हलता राही तुला वेधुनी ।
आहे प्राप्त सदा नरास करणे, तो आद्य विद्यार्थ की ।
नाना कष्टही सोशिले गुरुघरी श्रीरामकृष्णादिकी ।।

卐

सत्याने चल धर्मही करि सदा स्वाध्याय सोडू नको ।
तू मातापितरांसी वंदन करी कोणास निंदू नको ।
आचार्यास सदा नमून मिळवी विद्याही लाभप्रद ।
आता तू व्रत आचरी दृढपणे कुर्यात बटो मंगलम् ।।

卐

मातेचे घर सोडुनी गुरुकुळी आता पुढे राहणे ।
विद्याभ्यास करी यथार्थ जगती सामर्थ्य संपादणे ।
आज्ञापालनही सुबुद्धि धरुनी सर्वकष उन्नती ।
साधावी, उपदेश हा करितसे कुर्यात बटो मंगलम् ।।

卐

संध्यावंदन नित्य शुद्ध करणे गायत्रिमंत्रात्मक ।
सूर्याला नमने शरीरबलही संपादणे नेमक ।
होवो त्वन्मतिही सतेज मनने अभ्यास पारंगत ।
ब्रह्मज्ञानही मेळवी सविनये कुर्यात बटो मंगलम् ।।

पायीं वाळे पैंजणालागी शोभा।
गोपींमध्ये ठेंगणा कृष्ण उभा।
ऐसा त्याते क्रीडविती कुमारी।
पायादेवो वामनो ब्रह्मचारी।।

卐

पहा हो हा बटु शोभतो साना।
वाळेनुपुरे दिसे गोजिरवाणा।
ऐसा त्याते क्रीडविती कुमारी।
पाया देवो वामनो ब्रह्मचारी।।

卐

अनुपम्य बटो सुवदन साजे।
नानापरी बहुवाद्ये वाजे।
ऐसा त्याते क्रीडपिती कुमारी।
पाया देवो वामनो ब्रह्मचारी।।

卐

नानापरी मिळाली कुमरे।
बाळा नाना छंदे क्रीडती खेळखेळां।
ऐसा त्या क्रीडविती कुमारी।
पाया देवो वामनो ब्रह्मचारी।।

माघापासुनी पांच बरवे ती शुक्लपक्षी तिथी।
द्वितीया पंचमी षष्ठिका दशमी हे एकादशी द्वादशी।
ऐसा मास तिथी मिळूनी बटुशी।
कुर्यात बटो मंगलम्।।

卐

रात्री ते प्रहराहुनि अधिक जी ऐसी तृतीया बरी।
षष्ठी यामदिनाहुनी जरी तरी रात्री शुभा ते करी।
तैशी द्वादशी अर्धरात्र उपरी वेष्टोनि राहे स्वरी।
ऐशा तिथी त्या प्रदोष चुकल्या कुर्यात बटो मंगलम्।।

卐

स्वर्क्रक्षश्वां सुसौम्या श्रुतिपतिरपि चेत्केंद्रे कोणे।
स्थितः स्युः।
वर्णिविदा यवत्ता पशुपति मृह धनवादः मन्दः।
अन्त्ये शिवा कुर्यात बटो मंगलम्।।

卐

श्रीमत्तातपदारविंद विपुले ध्यानस्तवारोधरा।
सक्तः स्वादत्त पुण्डरीकवरदो राजाधिराजोहरः।
या श्रीश्चंदजन चर्चितोभुतमुखो भीमातटे राधिके।
गोपीनन्दन वंदिता दशशिरो कुर्यात बटो मंगलम्।।

卐





# अथ उपनयन ललित

ईश्वरोवन निवास तत्परः पार्वती गिरिसुता विदधानः।
संस्तुतो भवनि विघ्न विनाशो ब्रह्मचारि बटवे वरदस्यात् ।।१।।
भोगिभूषित विभूषित गात्रो हस्तकल्पितसुमोदक पात्रः।
विघ्ननाशन कर शिवपुत्रोब्रह्मचारी बटवे वरदस्यात् ।।२।।
मौजीचंदडो यज्ञोपवितं कमंडलुसतिलकोपधारि।
स्याब्रह्मचारी-शिखिवाहनोपिश्रियंकुमाराय शुभंददातु ।।३।।
एक एव जगतां मधुनेशा सायुधो वरकरोगणराजः।
हस्ति राज वदनाविराजितो ब्रह्मचारी बटवे वरदस्यात् ।।४।।
वानरो वनचरोपिवानरो राघवस्य करुणार्पिचित्तः।
अंजनीं जठर संभव बालो ब्रह्मचारी बटवे वरदस्यात् ।।५।।
विघ्नपुंजदहनो गणपालो ह्यर्धचंद्र तिलकाकित भालः।
पादमर्दित निजाश्रित कालो ब्रह्मचारी बटवे वरदस्यात् ।।६।।
अभ्रश्यामः शुभ्रयज्ञोपवीतो सकोपीतः पीतः कृष्णजिनश्रीः।
छत्री दंड पुंडरीकायताक्ष पायादेवो वामनो ब्रह्मचारी ।।७।।

अजित दंड कमंडलु मेखला रुचिर पावन वामन मूर्तये ।
मित जगत्रितयया-जितारये, निगम वाक्पटवे बटवे नमः ।।८।।
रेणुकाशतहुताशन धाम जामदग्नि कुलभुषणराम ।
क्षत्रियांत करणोत्तम वर्णो ब्रह्मचारी बटवे वरदस्यात् ।।९।।
यावद्वीचीस्तरंगान् बहति सुनरदी जान्हवी पुण्य तोया ।
यावच्चाकाश मार्गेत् पतिहिमकरो भास्करो लोकपालः ।
यावद्व्रज्रेनील स्फटिकमणि शिला वर्तते मेरु शृंगे ।
तावत्त्वं पुत्र पौत्र स्वजन परिवृत्तो जीव शंभोः प्रसादात ।।१०।।
तदेव लग्नं सुदिनं तदेव । ताराबलं चंद्रबलंतदेव ।
विद्याबलं दैव बलं तदेव । लक्ष्मीपते तेऽघ्रियुगं स्मरामि ।।११।।
बटुते गणनाथ चिंतन करविजे सुमुहूर्त सावधान् ।
ब्रह्मसावित्री चिंतन करविजे सुमुहूर्त सावधान् ।
इष्ट देवता कुलदेवता ग्रामदेवता चिंतन सुमुहूर्त सावधान् ।
उमामहेश्वर चिंतन सुमुहूर्त सावधान् ।
लक्ष्मी नारायण चिंतन सुमुहूर्त सावधान् ।
अंतःपटा असिजे सुमुहूर्त सावधान् ।
जया घंटा शब्दे प्रमाणम् अत्यासंधि सावधान् ।
अति सुलग्न सावधान् अति सुमुहूर्त सावधान् ।
अतिसावधान् । सावधान् सावधान् ।।

卐





# विवाह संस्काराची थोडक्यात माहिती

देव, ब्राह्मण, अग्नी आणि उपस्थित समाजाच्या साक्षीने संपन्न होणाऱ्या विवाहविधीलाच धर्मशास्त्रात मान्यता आहे.

त्याचप्रमाणे 'कन्यादान' हे महान दान समजले जाते. या विवाहविधींद्वारे याचे पुण्य वधूच्या माता-पित्याला प्राप्त होते.

हा विवाहसंस्कार पुढीलप्रमाणे पार पडतो.

**१) पत्रिका जुळणे** – अनुरूप जोडीसाठी दोघांचे शिक्षण, रूप, आर्थिक स्थिती हे पाहिले जाते. तसेच त्या दोघांची रास, नक्षत्र, गण, गोत्र, चंद्रबल हे पाहून त्यांचे गुण-मीलन करतात. या जर गोष्टी जमल्या तरच पुढे पाऊल टाकले जाते.

**२) एकमेकांची पसंती** – पत्रिका जुळली की वधू-वरांचा पाहण्याचा कार्यक्रम होतो. यात दोघांची व घरच्या मंडळींची पसंती - नापसंती ठरते. नंतर पुढील कार्यक्रम ठरतो. नंतर एखादा चांगला दिवस पाहून लग्नकार्याच्या याद्या, हळद फोडणे, मान-पानाचे देणे-घेण्याचे ठरते.

**३) साखरपुडा** – नंतर एखादा चांगला दिवस पाहून साखरपुडा करतात. यात वधूचे वडील वर मुलाला नवीन कपडे, पेढ्याचा पुडा देतात. तर वराचे वडील वधूला नवीन साडी व पेढ्याच्या पुडा देतात. नंतर एकमेकांच्या बोटात अंगठ्या घालून साखरपुडा साजरा करतात.

**४) सीमांत पूजन** – साखरपुड्यानंतर वेध लागतात ते लग्नाचे. सीमांत

पूजन हे लग्नाच्या आदल्या रात्री होते. यात सगळ्यांच्या ओळखीचा कार्यक्रम होऊन नवरदेवाचे स्वागत-पूजन करतात.

**५) घाणा भरण व हळदी समारंभ** - आंब्याच्या पानांनी सुशोभित केलेले दोन मुसळ पिवळ्या धाग्याने एकमेकांना बांधलेले असतात. या मुसळांनी उखळात किंवा रोळीमध्ये उडीद, हळकुंडे, सुपारी, तांदूळ कांडले जातात. यावेळी घाणा भरण्याच्या ओव्या म्हणतात.

घाणाभरणानंतर त्यातील हळद वधू-वरांना लावतात. वराला हळद लावून झाल्यावर तीच हळद वधूला लावण्याची ही पद्धत आहे. याला 'उष्टी हळद' असे म्हणतात. नंतर दोघांना मंगलस्नान घालण्यात येते.

**६) देवदेवक / पुण्याहवाचन** - शास्त्रशुद्ध संकल्प, गणपतीची पूजा, देवांची प्रतिष्ठापना, स्वस्तिवाचन, मातृका पूजन इ. गोष्टी या कार्यक्रमात विधिपूर्वक करतात. हा विधी दोन्ही पक्षांनी वेगवेगळा करायचा असतो.

याच वेळेस यजमानास व वधू-वरांस जवळच्या नातेवाईकांनी व घरच्या लोकांनी 'घरचा आहेर' करायचा असतो.

**७) गौरीपूजन** - विवाहासाठी नटून-थटून तयार झालेली वधू बोहल्यावर चढण्यापूर्वी गौरीहराचे पूजन करते. त्याला गौरीहरपूजन असे म्हणतात

चौरंगावर किंवा पाटावर गौरीहराची प्रतिमा ठेवून त्यांची पूजा वधूने अक्षता समर्पित करत 'हे गौरीमाते, मला सौभाग्य दे, सुख व संतती दे' अशी प्रार्थना करते.

**८) मंगलाक्षता आणि मंगलाष्टके** - सजवलेल्या लग्नमडपात वर येताच, मुलीच्या मामांना मुलीला घेऊन यायला सांगतात. अक्षतांचे वाटप होते. वधू-वरांच्या हातात फुलांच्या माळा देऊन एकमेकांसमोर उभे करतात. ते दोघे एकमेकांना दिसणार नाहीत असा अंतरपाट भटजी धरून उभे राहतात. दोघांच्या करवल्या मागे ताम्हनात दिवा आणि कलशात पाणी घालून त्यावर

नारळ ठेवून उभ्या राहतात.

मुहूर्ताच्या आधी ईश-वंदन, मंगलाष्टके होतात. नतर नियोजित वेळेला 'तदेव लग्नं सुदिनं तदेव' ही मंगलाष्टक म्हणून अक्षता टाकत अंतरपाट दूर करतात. नंतर वधू-वर एकमेकांच्या गळ्यात हार घालतात. वाजंत्री, बँड वाजतो. टाळ्यांचा कडकडाट होतो.

नंतर करवल्या त्यांच्या डोळ्याला कलशातले पाणी लावतात व हातातील दिव्याने ओवाळतात.

**९) कन्यादान** – लग्न लागल्यानंतर पूर्वेकडे तोंड करून उभे असलेल्या वराच्या ओंजळीत वधूपिता पाण्याची धार धरतो. हे पाणी वधूची माता घालते. यावेळी कन्यादानाचा मंत्र उच्चारला जातो: आणि 'मी माझी कन्या आपल्याला दान देतो आहे' असे वधूपिता म्हणतो.

त्यावेळी वराने सुद्धा कन्यादान स्वीकारले हे सांगावे लागते. याचे वेळी त्याला 'धर्मेच अर्थेच कामेच नातिचरामि' असे वचन वरास वधूपित्याला द्यावे लागते.

**१०) कंकण बंधन व लाजा होम** – कन्यादानानंतर वधूवरांना कंकण-बंधन करतात. दुधात भिजवलेले दुहेरी सूत वराच्या कंठाजवळ वेढलेले असते. दुसरे सूत वधूच्या कंबरेजवळ वेढलेले असते.

नंतर त्या भिजवलेल्या सूतात हळकुंड बांधतात. वराच्या कंठाजवळचे सूत वर वधूच्या डाव्या मनगटावर बांधतो तर वधूच्या कंबरेजवळ वेढलेले सूत वधू वराच्या उजव्या मनगटावर बांधते.

त्यानंतर वर वधूस सौभाग्याचे लेणे देतो. तिच्या गळ्यात मंगळसूत्र घालतो. नंतर सूनमुख पाहण्याचा कार्यक्रम होतो. यात वधूवरांचे एकमेकांस डोके लावण्याची जी परंपरा आहे त्याचा अर्थ असा की पुढच्या भावी आयुष्यात तुम्ही दोघे एकमेकांशी, परस्परांशी, एकमताने व एकविचाराने राहण्याची इच्छा प्रकट करतात.

त्यानंतर योनक नावाच्या अग्नीला तुपाची आहुती देतात. वधूचा भाऊ तिच्या हातावर लाह्या देतो व तो हात आपल्या हातात घेत वर मंत्रोच्चारानुसार त्या लाह्या अग्नीला अर्पण करतो. याला लाजा होम असे म्हणतात.

कानपिळीचा विधी येथेच संपन्न होतो. वधूचा भाऊ वराचा कान पिळतो.

या वेळी अग्नीच्या साक्षीने आम्ही दोघे एकमेकांवर सदैव प्रेम करू. सदैव एकमेकांच्या बरोबर निष्कपटपणे वागू. अशी शपथ घ्यायची असते.

**११) सप्तपदी** – विवाह होमाच्या जवळ तांदळाच्या सात छोट्या छोट्या राशी मांडतात. त्यावरून वधू वराच्या मागे चालत जाते. ही सात पावलांची चाल सात जन्मांची, एकोप्याची व एकत्र वाटचाल करण्याची प्रतीकात्मक साक्ष असते.

यानंतर जेवणाचा कार्यक्रम पार पडतो. नंतर वधूची पाठवणी केली जाते. यावेळी आमच्या लेकीला सांभाळा, तिची नीट काळजी घ्या अशी विनवणी केली जाते.

**१२) गृहप्रवेश व लक्ष्मीपूजन** – आपल्या संस्कृतीप्रमाणे नव्या जोड्यास लक्ष्मीनारायण मानण्याची प्रथा आहे. त्यामुळे नवीन वधू घरात येताना तांदळाचे माप ओलांडून आत येते. याला गृहप्रवेश म्हणतात.

उंबरठ्यावरचे हे तांदळाचे माप ओलांडून लक्ष्मी सोनपावलांनी, सुख-समृद्धी घेऊन घरी आली असा त्याचा अर्थ असतो.

नंतर दोघेजण घरी लक्ष्मीपूजन करतात. मग भरल्या तांदळाच्या ताटात वर सोन्याच्या अंगठीने वधूचे बदललेले नाव लिहितो व सर्वांना सांगतो. तेच नाव नंतर ती सौभाग्यवती म्हणून धारण करते. सर्वांना साखर वाटण्यात येते.

असे हे विवाह सोहळ्यातील आवश्यक व महत्त्वाचे विधी आहेत.



**धार्मिक प्रकाशन संस्थेची**
**लोकप्रिय प्रकाशने**

**संपूर्ण चातुर्मास**
संपादक : का.अ.जोशी

**संपूर्ण सुलभ ज्ञानेश्वरी**
संपादक : का.अ.जोशी

**श्री एकनाथी भागवत कथासार**
एकनाथी भागवताचा सुगम सारांश

**श्रीभावार्थ रामायण कथासार**
(श्रीसंत एकनाथ महाराजकृत)

**सार्थ श्रीज्ञानेश्वरी** किंमत रु. १६०/-
संपादक : का. अ. जोशी

**श्री गुरुचरित्र** साधी बांधणी
सरस्वती गंगाधर कृत

**श्री नवनाथ भक्तिसार**
(धुंडिसुत श्री. मालुकवि विरचित)

**श्री भक्तविजय पोथी**
श्री महिपती विरचित

**श्री हरिविजय पोथी**
पंडितकवि श्रीधर विरचित

**श्री नासिकेत पोथी**

**श्री देवी माहात्म्य** रामबाबा वर्णेकर




**श्री मल्हारी माहात्म्य पोथी**
डेमी साईज

**श्री नवनाथ कथासार**
जितेंद्र ठाकूर

**श्री हरिविजय कथासार**

**श्री भक्तविजय कथासार**

**श्रीशिवलीलामृत कथासारासहित**



धार्मिक प्रकाशन संस्था, मुंबई

Scanned by CamScanner